**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान कार्यक्रमांतर्गत नंदुरबार, व तळोदा येथील रस्ते विकास प्रकल्प तसेच कळवण व जव्हार येथील पाणीपुरवठा प्रकल्प यांसाठी निधी वितरण. (मुख्य लेखाशीर्ष - २२१७ ए ०६५)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र. १४/ कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-**४०० ०३२
**तारीख : ३१ मार्च,** २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.
३) नगरविकास शासन विभाग, शासन निर्णय क्र.नगरो-२०१४/प्र.क्र.११९/नवि-३३, दि.२१.०८.२०१४.
४) नगरविकास शासन विभाग, शासन निर्णय क्र.नगरो-२०१५/प्र.क्र.२७३/नवि-३३, दि.११.१२.२०२०.
५) नगरविकास शासन विभाग, शासन निर्णय क्र.नगरो-२०२३/प्र.क्र.३८९/नवि-३३, दि.२२.०२.२०२४.
६) नगरविकास विभागाची नस्ती क्र.नगरो-२०२४/प्र.क्र.२७९ (भाग-१)/नवि-३३.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागरी भागात मूलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरीता संदर्भाधीन क्र.२ अन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान राबविण्यात येत आहे. या अंतर्गत मंजूर करण्यात येणाऱ्या प्रकल्पांकरीता आदिवासी उपयोजना क्षेत्रातील नगर परिषद/नगरपंचायतीच्या स्वहिश्श्याकरीता आदिवासी उपयोजनेमधून निधी उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये धोरण ठरविण्यात आले आहे.

त्या अनुषंगाने नंदुरबार, व तळोदा येथील रस्ते विकास प्रकल्प तसेच कळवण व जव्हार येथील पाणीपुरवठा प्रकल्प यांसाठी आदिवासी उपयोजनेतून उपलब्ध करुन देण्याबाबत वाचा क्र. ६ येथील प्राप्त प्रस्तावावर देण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५, २२१७, नगरविकास, ८०-सर्वसाधारण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजना अंतर्गत महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान योजनेसाठी सन २०२४-

२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून नंदुरबार, व तळोदा येथील रस्ते विकास प्रकल्प तसेच कळवण व जव्हार येथील पाणीपुरवठा प्रकल्प यांसाठी अशा प्रकल्पासांठी खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्यात येत आहे:-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ साठी सुधारीत अंदाज | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | नगर पालिकेचे नाव | प्रकल्पाचा प्रकार | वितरीत निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियान अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेतील नागरी क्षेत्रातील आदिवासींना वित्तिय सहाय्य | २२१७ए०६५ | ३५, भांडवली मत्तेच्या निर्मिती करीता अनुदान | **२७९७.३१** (रु.१ हजार मूळ अर्थसंकल्पित तरतूद + रु.२७९७.३० लाख पुरवणी मागणी) | नंदूरबार | रस्तेविकास | ६३.४० |
| | | | | तळोदा | रस्तेविकास | ३.०० |
| | | | | तळोदा | रस्तेविकास | १२.०० |
| | | | | कळवण | पाणीपुरवठा | ७.०० |
| | | | | जव्हार | पाणीपुरवठा | ३.०० |
| | | | | **एकूण** | | **८८.४०** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.८८.४० लाख (अक्षरी रुपये अठ्ठयाऐंशी लाख चाळीस हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, नगरविकास विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा ई-ऑफिस क्र.१०४४९६१ वर, पृ. १९-३० /टि.वि. दि.३१.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३३११४२११९२२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.03.31 17:12:45 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय.
३. प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई-१८.
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र. ८, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग